**सन २०२३-२४ च्या टंचाई अंतर्गत मौ. बेल्हे, ता. जुन्नर, जि. पुणे या प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२४/प्र.क्र.५१/पापु १४**

जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ८ मे, २०२४

वाचा-

१) शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु-१४, दिनांक ३.२.१९९९

२) शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई २०१८/प्र.क्र.२०/पापु-१४, दिनांक १४.०२.२०१८

३) जिल्हाधिकारी, पुणे यांचे पत्र क्रमांक जा.क्र. मग्रारोहयो/टंचाई/कावि/१६८/२०२४ दिनांक २३.०४.२०२४

प्रस्तावना-

जिल्हाधिकारी, पुणे यांनी त्यांच्या दिनांक २३.०४.२०२४ च्या पत्रान्वये सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीसाठी मौ. बेल्हे, ता. जुन्नर, जि. पुणे येथील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्तीचा प्रस्ताव प्रशासकीय मंजूरी करिता शासनास सादर केला आहे.

राज्यात कमी पर्जन्यमानामुळे दुष्काळी / दुष्काळसदृश्य परिस्थिती निर्माण झाली असून त्यामुळे राज्यात ब-याच ठिकाणी भीषण पाणीटंचाई उद्भवली आहे. महसूल व वन विभागाने (मदत व पुनर्वसन) दिनांक १०.११.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये पुणे जिल्हयात दुष्काळ सदृश्य परिस्थिती घोषित करण्यात आली आहे. त्यामध्ये मौजे बेल्हे, ता. जुन्नर, जि. पुणे या महसूली मंडळाचा समावेश आहे. सदर वस्तुस्थिती, भारत निवडणूक आयोगाच्या दिनांक ०२.०१.२०२४ रोजीच्या पत्रातील मार्गदर्शक सूचना अ.क्र. III (i) नुसार, दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ मधील प्रकरण-४ नुसार सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन, मौ. बेल्हे, ता. जुन्नर, जि. पुणे या प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या विशेष दुरुस्ती या टंचाई उपाययोजनेतंर्गत रुपये १५,००,०००/- ( अक्षरी

रुपये पंधरा लक्ष फक्त ) इतक्या किंमतीच्या प्रस्तावास “विशेष बाब” म्हणून खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) सदर प्रस्तावनेत नमूद केलेली सर्व विशेष दुरुस्तीची कामे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे यांचेमार्फत करण्यात यावीत.
२) सदर योजनेची कामे विहित पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्वीकृत करु नयेत. निविदा प्रक्रीया पूर्ण झाल्यानंतर करारपत्रातील अटी व शर्तीनुसार दिलेल्या मुदतीतच योजना पुर्ण होणे आवश्यक आहे. कोणत्याही परिस्थितीत मुदतवाढ दिली जाणार नाही.
३) योजनेची निविदा अल्प मुदतीची (०७ दिवस ) काढण्यास परवानगी देण्यात येत आहे.
४) निविदा प्रक्रीया दिनांक १६ मे, २०२४ पर्यंत पूर्ण करुन कार्यारंभ आदेश देणे आवश्यक आहे.
५) निविदा प्रक्रीया दिनांक १६ मे, २०२४ पर्यंत पूर्ण करण्यात यावी.
६) योजनेची कामे दिनांक १६ जून, २०२४ पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे.
७) योजनेचे काम प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. त्यापेक्षा जास्त खर्च केल्यास त्याकरिता शासनाकडून निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. योजनेची किंमत वाढल्यास त्याची शासनस्तरावरुन गंभीर दखल घेऊन संबंधितांवर शिस्तभंग कार्यवाही करण्यात येईल.
८) योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास त्यास जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र राहतील.
९) योजनेचे काम मुदतीत पूर्ण होणे आवश्यक असल्याने योजनेच्या निविदा प्रक्रियेपासून ते योजनेतून पाणीपुरवठा सुरु होईपर्यंत आठवडयाच्या प्रत्येक सोमवारी प्रगती अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

**२. याबाबत होणारा खर्च “मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) ” या लेखाशीर्षांखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५०८११०३०७८८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVINKUMA
R GULABRAO
PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2024.05.08 13:22:37 +05'30'

**(प्रविणकुमार पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, महसूल ( मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
६. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
७. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
८. विभागीय आयुक्त, पुणे
९. जिल्हाधिकारी, पुणे
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे
१३. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती (पापु-१४ )